**मोटार वाहन विभागाचे संकेतस्थळाची देखभाल दुरुस्ती करण्याकरीता एका सिनियर सॉफ्टवेअर डेव्हलपर यांची सेवा मासिक मानधन तत्वावर घेणे व त्यापोटी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१११८/प्र.क्र.२४२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ३० नोव्हेंबर, २०१८

वाचा :

१) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग शा. नि. क्र. मातंसं-१७१७/प्र. क्र. १११/३९, दि.३.४.२०१८
२) परिवहन आयुक्त कार्यालयाचे क्र. पआका/का११/संगणक/वेबसाईट/२०१८/जा. क्र. १४९८४, दि. २०.१०.२०१८ व क्र. पआका/का.११/संगणक/वेबसाईट/देखभाल दुरुस्ती/ २०१८/जा. क्र. १६१६१, दि.२६.११.२०१८
३) मे. महाऑनलाईन यांचा दि.११.७.२०१८ व दि.२२.११.२०१८ रोजीचा ईमेल संदेश

**प्रस्तावना :**

मे. महा ऑनलाईन यांनी परिवहन विभागाचे "www.transport.maharashtra.gov.in” हे संकेतस्थळ दि.३.२.२०१७ पासून विकसीत केले आहे. सदर संकेतस्थळावरुन विभागाबद्दलची सर्व माहिती, नियम, नमूने, महत्त्वाचे निर्णय इ. माहिती नियमीतपणे प्रदर्शित करण्यात येते. सदरहू संकेतस्थळ सुरळीतपणे कार्यान्वित असून संकेतस्थळासंदर्भात तांत्रिक अडचणी उद्भवू नये म्हणून संकेतस्थळाची देखभाल व दुरुस्ती करणे आवश्यक आहे. या संकेतस्थळाचे विकासक मे. महा ऑनलाईन लि. यांनी संकेतस्थळाची देखभाल करणे, नवीन बाबींचा समावेश करणे इत्यादी कामांकरीता ४ वर्षे अनुभव असलेले तांत्रिक मनुष्यबळ म्हणून बाह्यस्त्रोताद्वारे एका वरीष्ठ सॉफ्टवेअर विकासकाची (Senior Software Developer) एक वर्षामधील ९० दिवसांकरीता नेमणुक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मोटार वाहन विभागाचे मे. महा ऑनलाईन यांनी विकसीत केलेले www.transport.maharashtra.gov.in या संकेतस्थळाची देखभाल व दुरुस्ती करण्याकरीता आणि मे. महा ऑनलाईन यांना आवश्यक असणारे तांत्रिक मनुष्यबळ म्हणून बाह्यस्त्रोताद्वारेएक वरीष्ठ सॉफ्टवेअर विकासक (Senior Software Developer) यांच्या सेवा एक वर्षामधील ९० दिवसांकरीता मासिक मानधन तत्वावर घेण्याकरीता व त्याचे मानधन अदा करण्याकरीता होणाऱ्या रु. ४,१२,१४१/- (रुपये चार लाख

बारा हजार एकशे एकेचाळीस फक्त) खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| Senior Software Developer | अपेक्षित खर्च |
|---|---|
| ९० दिवसांकरीता (३ महिने) मानधन<br>(दरमहा मानधन रु. १,१६,४२४/-) | रु.३,४९,२७२<br>(करांव्यतिरिक्त) |
| ९० दिवसांच्या मानधनाकरीता १८% जीएसटी | रु. ६२,८६९/- |
| एकूण ९० दिवसांकरीताचे करासहित मानधन | रु. ४,१२,१४१/- |

२. सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभागाच्या दि.३.४.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रत्येक महिना प्रत्येक व्यक्तीसाठी विहीत केलेल्या मासिक दराने (करांव्यतिरिक्त) तसेच विहीत अटी व शर्तींच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च हा "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०१) (०४) कार्यालयीन अभिलेख्यांचे संगणकीकरण (मोटार वाहन आणि मोटार अपघात दावा न्यायाधिकरण) (कार्यक्रम) (२०४१०२९७), १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, दि.१७.४.२०१५ (सुधारीत) मधील वित्तीय नियम भाग-पहिला, उपविभाग-चार मधील अनुक्रमांक ११ नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११३०११५४५२४२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.11.30 12:02:54 +05'30'

**( द. ह. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षक)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई

७. उप सचिव, साप्रवि (माहिती व तंत्रज्ञान), मुंबई.

८. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१२.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

१३.निवड नस्ती (परिवहन-४).